**उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्याक विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती योजनेंतर्गत शिष्यवृत्तींचे वाटप करण्यासाठी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०२५/१२५/प्र.क्र.५६/का-६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०२ जून, २०२५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक अविवि २०११ / प्र.क्र.४४ / ११ / का-६, दिनांक १४ ऑक्टोबर, २०११.
२) शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०२०/ प्र.क्र.५० /का-६, दिनांक ४.१०.२०२२
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५ /प्र.क्र.४४/अर्थ-३, ७.४.२०२५
४) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र. १८ /तंशिस /अर्थसं/अल्प./नि.मा./ २०२५-२६/२३२, दिनांक १६.०४.२०२५ चे पत्र.
५) संचालक, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण),महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रं. उशिसं / शिष्य २०२५-२६ / अल्पसंख्याक भाग २ / तरतूद / ई- १३६९३७६, दिनांक २५.०४.२०२५ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

१. राज्यातील अल्पसंख्याक समाजातील उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेत असलेल्या आर्थिकदृष्ट्या कमकुवत व गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजनेची अंमलबजावणी वरील संदर्भ क्र.१ येथे उल्लेखित दिनांक १४ ऑक्टोबर २०११ व संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय क्रमांक: अविवि-२०२०/ प्र.क्र.५० /का-६, दिनांक ४.१०.२०२२ च्या शासन निर्णयानुसार करण्यात येत आहे.

२. प्र. शिक्षण संचालक, (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे, आयुक्त, व संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांच्या अनुक्रमे संदर्भ क्र. ४ व ५ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार शैक्षणिक वर्ष सन २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२, २०२२-२३, २०२३-२४ व सन २०२४-२५ मध्ये अर्ज केलेल्या विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीसाठी निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्र. शिक्षण संचालक, (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे, व संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना शैक्षणिक वर्ष सन २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२, २०२२-२३, २०२३-२४ व सन २०२४-२५ मध्ये अर्ज मंजूर झालेल्या विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीसाठी **रू. १०.२०/- कोटी (अक्षरी रुपये दहा कोटी वीस लाख फक्त )** इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **नियंत्रण अधिकारी / कार्यालयाचे नाव** | **याद्वारे वितरीत करावयाची रक्कम रुपये** |
|---|---|---|
| १. | संचालक, शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य पुणे | **रु.८५,४५,०००/-** |
| २. | संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | **रू. ९,३४,५५,०००/-** |
| | | **रू. १०,२०,००,०००/-** |

**२.** सदरचा निधी प्र. शिक्षण संचालक, (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे, व संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या स्वाधीन करण्यात येत असून, सदर कार्यालयातील संचालक हे नियंत्रक अधिकारी म्हणून, तर सदर कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी हे प्रस्तुत योजनेकरिता देखील आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

**३.** याद्वारे वितरीत करण्यात आलेला निधी शैक्षणिक वर्ष २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२, २०२२-२३, २०२३-२४ व सन २०२४-२५ मध्ये पात्र ठरलेल्या ज्या विद्यार्थ्यांची शिष्यवृत्तीची रक्कम प्रलंबित आहे, अशा विद्यार्थ्यांची प्रलंबित रक्कम या आदेशान्वये वितरीत केलेल्या निधीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदरहू रकमेतून प्रलंबित रक्कम वितरीत केल्यानंतर तरतूद शिल्लक राहिल्यास, ती सन २०२५-२६ च्या लाभार्थी विद्यार्थ्यांच्या शिष्यवृतीकरिता उपयोगात आणावी. उपरोल्लेखित लेखानुदानाच्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास विहित कालावधीत सादर करावे. तसेच हे अनुदान खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वेळोवेळी शासनाने या अनुषंगाने दिलेले सर्व निर्देश / नियम / शासन निर्णय / आदेश आणि केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या निरीक्षणाचे पालन करण्यात यावे.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील शासन परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-३३८) ३४ -शिष्यवृत्त्या / विद्यावेतने" या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. **तसेच संचालक, शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य पुणे व संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी , गत आर्थिक वर्ष सन २०२४-२५ मध्ये सदर लेखाशिर्षांतर्गत वितरीत केलेल्या व त्यांच्या कार्यालयामार्फत लेखाशिर्ष २२३५-ए-३३८, ३४ -शिष्यवृत्त्या / विद्यावेतने याअंतर्गत माहे मार्च २०२५ अखेर खर्च झालेल्या निधीचा अधिदान व लेखा कार्यालय तथा महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ घेण्यात यावा. सदर ताळमेळाची प्रक्रिया तातडीने पूर्ण करण्याच्या अटीच्या अधीन राहून प्रस्तुत शासन निर्णयान्वये निधी वितरीत करण्यात येत आहे.**

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०२१८४६४७७०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MEGHANA GAURAV SHINDE

Digitally signed by MEGHANA GAURAV SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d29224e30812c4523eedb32c54f5cbc27548f81ccf656192b6d735115af1dfb8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D625CF85C370BB4C35F332D5F951F0A9CD61FAD5DDF056809A969BFDD9FDB7DA, cn=MEGHANA GAURAV SHINDE
Date: 2025.06.02 18:47:31 +05'30'

**( मेघना गौ. शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री अल्पसंख्याक विकास यांचे खाजगी सचिव
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधापमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई.
११. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१३. महालेखापाल १ / २ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
१४. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१६. संचालक, शिक्षण संचालनालय, (उच्च शिक्षण), पुणे.
१७. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१८. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
१९. सह सचिव /उप सचिव /अवर सचिव / कक्ष अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
२०. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवड नस्ती.